नगर रचना विभागातील अधिकाऱ्यांना सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका-१९८४ नुसार अधिकार प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक :** टिपीव्ही १९०८/२०२/प्र.क्र.६५/०८/नवि-२७.
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १९ नोव्हेंबर, २००९.

संदर्भ :- (१) शासन निर्णय, न.वि.वि., क्र.टिपीव्ही २१८०/१७८/सीआर ३०/युडी-६, दिनांक २१.५.१९८३.
(२) शासन परिपत्रक, न.वि.वि., क्र.टिपीव्ही २१८०/१७८/सीआर ३०/युडी-६, दिनांक २१.२.१९८५.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभागामध्ये राज्यातील नगरपरिषदांच्या विकास योजनेच्या प्रस्तावांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याचे काम संचालनालयास सोपविण्यात आले असुन त्यासाठी नगर रचना संचालनालयात सहसंचालक, नगर रचना, पुणे यांची सनियंत्रण अधिकारी (Over all incharge) म्हणून नियुक्तीसह अंमलबजावणी कक्ष स्थापन करण्यात आला आहे. या कक्षामध्ये कार्यकारी अभियंता, उपअभियंता या दर्जाची पदे निर्माण करण्यात आली आहेत. या निर्णयास अनुसरुन नगर रचना संचालनालयाने विकास योजना प्रस्तावांचे नकाशे / अंदाजपत्रके तयार करणे, तांत्रिक मंजुरी देणे, निविदा स्विकारणे अशा स्वरुपाची कामे करणे अभिप्रेत आहे. संदर्भ क्र.२ च्या शासन परिपत्रकानुसार राज्याच्या / केंद्र शासनाच्या योजनांवरील प्रस्तावांना तांत्रिक मंजूरी नगर रचना संचालनालयाकडून देण्यात येईल असे स्पष्टीकरणही दिले आहे. याव्यतिरिक्त सध्या शासनाच्या विविध योजनांतर्गत देण्यात येणाऱ्या निधीमधून नगरपरिषदेने हाती घेतलेल्या प्रस्तावांची अंमलबजावणी / तांत्रिक मंजूरी अशा स्वरुपाची कामे देखील संचालनालयाकडून हाताळली जातात. सदर कामासाठी नगर रचना संचालनालयाकडून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिका-१९८४ मधील परिशिष्ठ ४२ मधील अधिकारानुसार व त्या विभागाच्या इतर आवश्यक निर्णयानुसार अशा स्वरुपाच्या जबाबदाऱ्या पार पाडल्या जातात. तथापि, याबाबतची स्पष्टता संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामध्ये करण्यात आलेली नाही. त्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीनुसार नगर रचना विभागाच्या अधिकाऱ्यांना अधिकार प्रदान करण्याचा प्रस्ताव शासन विचाराधीन होता.

शासन निर्णय :

सार्वजनिक बांधकाम विभागातील कार्यकारी अभियंत्यांच्या कार्यकक्षेतील अधिकार या विभागात कार्यरत असलेल्या कार्यकारी अभियंत्यांकडून वापरले जात असुन त्यांचे वरिष्ठ स्तरावरील मुख्य अभियंता व अधिक्षक अभियंता यांचे अधिकार नगर रचना संचालनालयातील तत्सम दर्जाच्या संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व सहसंचालक, नगर रचना यांचकडून वापरले जातात. तसेच तांत्रिक मंजुरी देताना सहसंचालक, नगर रचना व कार्यकारी अभियंता यांच्याकडून एकत्रितरित्या व त्यावरील अधिकार संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे; सहसंचालक, नगर रचना व कार्यकारी अभियंता यांच्याकडून एकत्रितरित्या वापरले जात आहेत. त्यामुळे प्रस्तुत शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ अ नुसार संचालनालयातील अधिकाऱ्यांनी तांत्रिक व वित्तीय अधिकार वापरण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. या अधिकारांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ज्या ज्या वेळी बदल करण्यात येतील त्या त्या वेळी हे अधिकार नगर रचना संचालनालयातील संबंधित अधिकाऱ्यांना लागू होतील.

वरील अधिकारांबाबत काही स्पष्टीकरणाचा प्रसंग उद्‌भवल्यास संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्याचे शासन मान्यतेने निराकरण करावे.

हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९०८/लेखापरिक्षा, दिनांक १३.८.२००९ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४४४/०९/विनियम, दिनांक ८.९.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुरेश काकाणी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :
महालेखापाल-१, मुंबई.
महालेखापाल-२, नागपूर.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

एच-२०२९-१3

सचिव -२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहायक विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
सहसंचालक, नगर रचना, पुणे.
विभागीय आयुक्त, पुणे / औरंगाबाद / नाशिक / नागपूर / नांदेड /कोकण विभाग, नवी मुंबई / अमरावती.
सर्व जिल्हाधिकारी.
उपसंचालक, नगर रचना, पुणे / औरंगाबाद / नाशिक / नागपूर / कोकण विभाग, नवी मुंबई / अमरावती.
सहायक संचालक / नगर रचनाकार, नगर रचना (सर्व जिल्हे).
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
संगणक कक्ष, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
निवडनस्ती (नवि-२७).

**शासन निर्णय क्रमांक :** टिपीव्ही १९०८/२०२/प्र.क्र.६५/०८/नवि-२७, दिनांक : १९ नोव्हेंबर, २००९ सोबतचे परिशिष्ठ अ.

**परिशिष्ठ-अ**



| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १३ परिच्छेद क्र.१३५ | मुळ व सुधारित अंदाजपत्रकांना तांत्रिक मंजुरी देण्याचे अधिकार (एक) रस्ते आणि इमारती (राज्य केंद्रीय आणि लष्करी) सार्वजनिक आरोग्य, विद्युत संच मांडण्या आणि ठेव व अंशदाने घेऊन करावयाची कामे. | | | **टीप १ - तांत्रिक मंजुरी देण्याचा अधिकार हा, टक्केवारी खर्चाशिवाय असल्याचे समजण्यात यावे.**<br>**टीप २ - अंदाजपत्रक, नगर रचना विभागाच्या मान्य टाईप नकाशानुसार असतील तेव्हा सहसंचालक, नगर रचना, पुणे यांना कोणत्याही रकमेपर्यंतच्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मंजुरी देता येईल. मात्र हाती घेण्यात येणाऱ्या प्रकल्पाच्या बांधकाम नकाशास नगर रचना विभागाच्या संबंधित कार्यालयाकडून मंजूरी घेणे आवश्यक आहे. तसेच, प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास स्थानिक प्राधिकरणाची म्हणजेच संबंधित नगरपरिषदेची प्रशासकीय मान्यता आवश्यक आहे.**<br>**टीप ३ - सहसंचालक, नगर रचना, पुणे आणि कार्यकारी अभियंता यांना, परिच्छेद २५६ मध्ये निर्धारित केलेल्या शर्तींच्या अधीनतेने एखाद्या प्रशासनिक मान्यता दिलेल्या प्रकल्पाच्या घटक भागांसाठीच्या तपशीलवार अंदाजांनाही स्तंभ ५ मध्ये त्या त्या बाबींसमोर नमूद केलेल्या मर्यादेपर्यंत तांत्रिक मंजुरी देता येईल, असे घटक भाग हे, योजनेतील एक स्वतंत्र एकक असले पाहिजेत.** |
| | | (१) मुळ कामे | (अ) स्थापत्य विषयक कामासाठी (राज्यातील नगर परिषदांचा विकास योजनेतील अंमलबजावणीची कामे)<br>संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे; सहसंचालक, नगर रचना आणि संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना यांची समिती<br>सहसंचालक, नगर रचना आणि संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना यांची समिती<br>कार्यकारी अभियंता | पूर्ण अधिकार<br><br>रु. ६०,००,०००/-<br><br>रु. २५,००,०००/- | **टीप १ - मोठया पुलांच्या बाबतीत, सहसंचालक, नगर रचना, पुणे, कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी अधीक्षक अभियंता (अभिकल्पन मंडळ) यांची मान्यता मिळवली पाहिजे.**<br>**टीप २ - स्तंभ (५) मध्ये निर्दिष्ट केलेल्या अभियांत्रिकी कामांमध्ये पाण्याच्या टाक्या, कमी लांबीचे नळमार्ग, लहान उपरि टाक्या, नक्षीदार पिल्स्टर्न, तारेचे कुंपण, आहारगृह इत्यादींसारखी लहान बांधकामे इत्यादींसारख्या मान्य टाईपच्या व अभिकल्पना स्थापत्यविषयक कामांचा समावेश होतो. इतर कामांच्या बाबतीत संबंधित काम ज्याच्या अधिकारितेत असेल असा विभागाचा कार्यकारी अभियंता, हा, त्यासंबंधीचा व्यवहार करण्यास आणि नगर रचना विभागाच्या सक्षम अधिकाऱ्याची मंजुरी मिळवण्यास समुचित प्राधिकारी असेल.** |

| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| २ | १९ | निवडक कंत्राटदारांकडूनच निविदा मागविण्यासंबंधीची कारणे अभिलिखित करुन त्यांच्याकडून निविदा मागविण्याचा अधिकार | संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे<br><br>सहसंचालक, नगर रचना | रु.१२,५०,००० पर्यंतच्या खर्चाच्या कामासाठी<br><br>रु.५,००,०००/- | |
| ३ | --<br>परिच्छेद क्र.१९९ | निविदा पत्रक मागविण्याचे अधिकार | संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना | (अ) रु.२५,००,००० पर्यंतच्या कामाकरीता संपूर्ण अधिकार.<br>(ब) रु.२५,००,००० ते रु.६०,००,००० पर्यंतच्या कामाच्या निविदा पत्रकाचा मसुदा मंजुरी सहसंचालक, नगर रचना यांचेकडून प्राप्त झाले नंतर.<br>(क) रु.६०,००,००० वरील कामाच्या निविदा पत्रकाचा मसुदा मंजुरी संचालक, नगर रचना यांचेकडून प्राप्त झाल्यानंतर. | |

| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ४ | २० व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२०.९.९७ च्या परिपत्रकानुसार परिच्छेद क्र.२१७ | निविदा स्विकारण्याचा अधिकार (अधिक्य मंजुरीच्या अधिकारासह व निविदेतील शर्तीच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने आवश्यक अधिकारांसह) | संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>सहसंचालक, नगर रचना.<br>संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना | पूर्ण अधिकार<br>रु.१,२५,००,०००/-<br>रुपये २५,००,०००/-. | टीप १ - कार्यकारी अभियंतापेक्षा वरच्या दर्जाच्या अधिका-याने कंत्राटी करारांना मंजुरी दिली असेल तेंव्हा कंत्राटी कराराची प्रत विभागीय कार्यालयात तयार करावी आणि मंजुरी देणा-या प्राधिका-याने ती पृष्टांकित करण्यासाठी विभागीय कार्यालयाने ती त्या प्राधिका-या मार्फत लेखा परिक्षा अधिका-याकडे पाठवावी. तसेच मंजूरी देणारा प्राधिकारी अशा करारांच्या अनुषंगाने मंजुरी दिलेल्या ज्यादा बाबींच्या दर सूच्यांच्या प्रतीही लेखापरिक्षा अधिका-यांकडे पाठविल.<br>टीप २- निविदेत नमूद केलेली रक्कम हाच, निविदा स्वीकृतीच्या संबंधातील निर्णायक घटक असेल, अंदाजित खर्च नव्हे.<br>टीप ३- निविदांसाठी जाहिरात देताना संबंधीत कामाच्या अंदाजित खर्चाच्या संदर्भात, निविदा मंजूर करण्यास कोणता प्राधिकारी सक्षम आहे ते नमूद करण्यात आले पाहिजे.<br>टीप ४ - निविदेत नमूद केलेली रक्कम ही, मंजूर अंदाजित रक्कम अधिक अधिकारी अधिक खर्चाची जी रक्कम मंजूर करण्यास सक्षम असेल अशी अधिक खर्चाची रक्कम यांपेक्षा जास्त असेल तेंव्हा निविदा स्वीकारण्यासाठी अनुसरावयाची कार्यपध्दती अशी असेल कि, एरवी निविदा स्वीकारण्यास सक्षम असलेल्या अधिका-याने निविदेच्या स्वीकृतीत अंतर्भूत असलेल्या मंजूर अंदाजापेक्षा अधिक खर्चाच्या रकमेसाठी सक्षम प्राधिका-याची मंजुरी मिळवावी आणि त्यानंतर त्याने निविदा स्वीकारुन नेहमीप्रमाणे शासनाच्या वतीने करावयाच्या दस्तऐवजांवर सही करावी.<br>टीप ५- उक्त्या कामासाठी प्रपत्र ए-१ किंवा ए-२ मध्ये सादर केलेल्या निविदांची छाननी करताना, कार्यकारी अभियंत्यास, कधी कधी कामाच्या एखादया उपशीर्षाखाली अंदाजित दरांपेक्षा बराच जास्त दर देणे आवश्यक असल्याचे आढळून येते. अशा प्रकरणात, अन्यथा त्यांच्या अधिकारात असेल तर त्याला निविदा स्वीकारता येतील, परंतु संपूर्ण अंदाज त्यामुळे ५ टक्क्यांपेक्षा, जास्त रकमेने वाढवण्याचा संभव असेलतर उपशीर्षावरील अधिक खर्च विनियमित करण्यासाठी सक्षम प्राधिका-याच्या मंजुरीकरता कार्यचिठ्ठीच्या नमून्यात अंदाजाचा सुधारित गोषवारा त्याने सादर करावा. संपूर्ण अंदाज ५ टक्क्यांनी किंवा त्यापेक्षा कमी रकमेने वाढण्याची शक्यता असेल तेंव्हा, कार्यचिठ्ठी सादर करण्याची गरज नाही, परंतु अंदाजित दरांच्या १० टक्क्यापेक्षा अधिक रकमेने जास्त असेल असा कोणताही स्वतंत्र दर समंत करण्यासाठी सहसंचालक, नगर रचना, पुणे यांची मंजुरी मिळविण्यात यावी. तथापि, ज्या प्रकरणात निविदेत नमूद केलेल्या दरांवर आधारित असलेला कामाचा एकूण खर्च मंजूर अंदाजित रकमेपेक्षा जास्त होत नसेल अशा प्रकरणात, मंजूर अंदाजामधील एक एका बाबीसाठी निविदेत नमूद केलेल्या वाढीव दरांसाठी सहसंचालक, नगर रचना, पुणे यांच्या मंजूरीची आवश्यकता असणार नाही.<br>टीप ६ - अंदाजपत्रकांमधील एखाद्या दुय्यम कामांसाठी किंवा मंजूर अंदाजपत्रकाच्या एखाद्या भागासाठी निविदा स्वीकारताना, निविदेशी संबंधीत भागाच्या मंजूर अंदाजाची रक्कम संपूर्ण कामाच्या अंदाजाची नव्हे, वरील नियम लागू करताना विचारात घ्यावी. |



 

| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ५ | २१ परिच्छेद क्र.२२० | निविदेतील मंजूर केलेल्या दरांपेक्षा जास्त वाढीव दरांसाठी केलेल्या मागण्या मंजुर करण्याचा अधिकार. | सहसंचालक, नगर रचना. | कामाच्या कोणत्याही एका बाबीसाठी १० टक्क्यांच्या मर्यादेपर्यंत, मात्र<br>(एक) सदर अधिकार निविदेतील केवळ एकाच बाबीचा दर वाढविण्यापुरता असला पाहिजे आणि वाढीची मर्यादा प्रस्तुत बाबीसाठी निविदेत नमुद केलेल्या दराच्या १० टक्क्यांपर्यंत किंवा रु.१,२५,०००/- यापैकी जी रक्कम कमी असेल त्या रकमेपर्यंत असेल. तसेच अशा वाढीनंतर निविदेची वाढीव रक्कम ही संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याच्या स्विकृतीच्या अधिकाराच्या मर्यादेच्या आत असली पाहिजे.<br>(दोन) निविदेमध्ये या बाबीच्या बाबतीत खर्च वाढीवर कोणतीही कमाल मर्यादा घालण्यात आली असेल तर, वाढीच्या सुधारणेमुळे त्याबाबीवर होणारी एकूण वाढ ही निर्धारित कमाल मर्यादेपेक्षा अधिक होता कामा नये.<br>(तीन) स्तंभ(४) नमूद केलेल्या अधिकाऱ्याने अशी सर्व प्रकरणे माहितीसाठी आणि अभिलिखित करण्यासाठी आपल्या निकटतम वरिष्ठ प्राधिकाऱ्यास तसेच शासनास कळवावीत.<br>(चार) जर अधिक खर्चाची रक्कम रुपये १,२५,००० पेक्षा जास्त होत असेल तर स्तंभ (४) मध्ये नमूद केलेल्या प्राधिकाऱ्याने मान्यता मिळविण्यासाठी शासनाशी संपर्क साधावा | टीप - पाणी काढून टाकण्याच्या प्रमाणातील वाढ, काही सामग्रीच्या किंमतीत अचानक वाढ( विवक्षीत स्थानिक बाबींमध्ये वाढ) इत्यांदीसारख्या अनपेक्षित बाबींच्या बाबतीत वाढीच्या मागण्या मंजूर करताना या अधिकाराचा वापर करता येईल. |

| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ६ | २४ परिच्छेद क्र.२२७ | कामाच्या अतिरिक्त बाबी पार पाडणे | संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना | प्रत्येक अतिरिक्त बाबीसाठी रुपये ५०,०००/-. | (अ) वरिष्ठ अधिका-यांनी स्वीकारलेल्या रीतसर निविदांमध्ये तरतूद नसलेल्या कामाच्या जादा बाबी त्यांच्या दुय्यम अधिका-यांनी पार पाडण्यास आणि त्यासाठी द्यावयाच्या दरांना मंजूरी देण्यास कार्यकारी अभियंत्यांना प्राधिकार देण्यात आला आहे, मात्र त्यासाठी खालीलप्रमाणे शर्ती पाळाव्या लागतील :-<br><br>(१) एक एका अतिरिक्त बाबीचा खर्च रुपये २५,००० पेक्षा जास्त होता कामा नये आणि अशा अतिरिक्त बाबीतील एकूण खर्च हा, कार्यकारी अभियंता स्वतः जितक्या रकमेपर्यंतच्या निविदा स्वीकारण्यास सक्षम असेल त्या रकमेच्या आत असला पाहिजे.<br><br>(२)(अ) अतिरिक्त बाब ही, स्वीकृत निविदेमध्ये पूर्वीच समाविष्ट असलेल्या तत्सम बाबीसारखीच असेल तेंव्हा, निश्चित करावयाचा आणि प्रभारी अभियंता व कंत्राटदार यांनी परस्पर संमत करावयाचा दर हा, शक्य असेल तेथवर तत्सम बाबीच्या विनिर्देशातील बदलामूळे आवश्यक ठरलेल्या मर्यादेपर्यंत सुधारलेल्या निविदा दरावर आधारलेला असावा. मात्र, विभागाच्या दर- अनुसूचीमध्ये अतिरिक्त बाबीसाठी दराची तरतूद असेल तर, निश्चित करावयाचा दर हा, अशा अनुसूचीतील दरापेक्षा जास्त असता कामा नये.<br>(ब) अतिरिक्त बाब ही, स्वीकृत निविदेतील बाबीसारखी किंवा तिच्याशी तुल्य नसेल तर त्यासाठी प्रभारी अभियंता आणि कंत्राटदार यांनी परस्पर संमत केलेल्या दराने पैसे देण्यात येतील, मात्र तशा प्रकारच्या कामासाठी विभागाच्या दर-अनुसूचीमध्ये तरतूद असेल तर, संमत करावयाचा दर हा, अशा अनुसूची दरापेक्षा जास्त असता कामा नये.<br><br>(३)(अ) अतिरिक्त बाब किंवा बाबींवरील जादा खर्च हा, कामाच्या इतर बाबींवर (आकस्मिक खर्च धरून) केलेल्या किंवा स्पष्टपणे अपेक्षित असलेल्या बचतीद्वारे अगोदरच भागवला गेलेला असला पाहिजे. अशा प्रकरणी, प्रस्तुत बचत ही, जादा बाबींच्या दरसूचीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात आली पाहिजे.<br>(ब) एखाद्या स्वतंत्र अतिरिक्त बाबींची रक्कम रुपये २५,००० पेक्षा अधिक होत असेल किंवा त्यासाठी प्रस्तावीत केलेला दर हा विभागीय अनुसूचीत अगोदरच मंजूर केलेला दर नसेल किंवा तो त्यात मंजूर केलेल्या दरांपेक्षा जास्त असेल तर, अशा दरासाठी सहसंचालक, नगर रचना, पुणे यांची पूर्व मंजूरी मिळवण्यात आली पाहिजे.<br><br>जर अतिरिक्त बाबींसाठी कंत्राटदारास ( निविदेच्या अनुसूची 'ए' मध्ये तरतूद केलेल्या सामग्री व्यतिरिक्त इतर) सामग्री पुरवावयाची असेल तर, अतिरिक्त बाबींच्या दरसूचीमध्ये दर परिमाण आणि सामग्री पोचवण्याचे ठिकाण विनिर्दिष्ट करण्यात आले पाहिजे. अतिरिक्त बाबींसाठी दर निश्चित करताना अनुसूची 'ए' मधील किंवा त्याबाहेरील सामग्रीचा पुरवठा करण्यात येणार असण्याची बाब विचारात घेण्यात आली पाहिजे. |

| अ. क्र. | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिशिष्ठ ४२ मधील अ.क्र. व परिच्छेद क्र. | अधिकाराचे स्वरुप | अधिकाराचा वापर करण्यास नगर रचना विभागातील सक्षम असलेले प्राधिकारी | अधिकाराची व्याप्ती | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ७ | ३३<br>परिच्छेद क्र.३०० | ठेव आणि अंशदाने घेऊन करावयाची कामे स्वीकारण्याचा अधिकार | संचालक, नगर रचना<br><br>सहसंचालक, नगर रचना<br><br>संबंधित कार्यकारी अभियंता, अंमलबजावणी कक्ष, नगर रचना | पूर्ण अधिकार<br><br>रुपये १०,००,०००/-<br>रुपये २,५०,०००/- | टीप - हे अधिकार टक्केवारी खर्च वगळून आहेत. टक्केवारी खर्च देण्याबाबतची अट शासनाच्या विशेष मंजूरीशिवाय, कोणत्याही प्रकारे शिथिल करण्यात येऊ नये. |

--------